अचानक नाहीशा झालेल्या व ठावठिकाणा माहिती नसलेल्या शासकीय कर्मचारी/निवृत्तीवेतनधारक यांच्या कुटुंबियांना कुटुंबनिवृत्तीवेतन व उपदान मंजूर करणेबाबत
**श्री. विठ्ठल गणपत तोतरे, शिपाई**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण२०२२/प्र.क्र.०८/२२/प्रशा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०४ एप्रिल, २०२२

वाचा:- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:सेनिवे-१०३९/४९१/सेवा-४, दि.५.७.१९९१
२) शिक्षण आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र आका/आस्था-ब-१२२/१८७६२/२०२२/१३१, दिनांक ६.१.२०२२

प्रस्तावना :-

श्री. विठ्ठल गणपत तोतरे, शिपाई हे शिक्षण निरीक्षक, दक्षिण विभाग, बृहन्मुंबई यांचे आस्थापनेवर कार्यरत होते. ते दिनांक १६.७.२०१३ पासून बेपत्ता झाले आहेत. श्री.विठ्ठल गणपते तोतरे हे बेपत्ता झाल्याची तक्रार त्यांची पत्नी श्रीमती सुनिता विठ्ठल तोतरे यांनी दिनांक १६.७.२०१३ रोजी दिल्याचे वरिष्ठ पोलीस निरीक्षक हरविलेल्या व्यक्ती संबंधीचे केंद्र गुन्हे शाखा, गु.अ. विभाग, मुंबई यांच्या दिनांक २६.७.२०१३ रोजीच्या तक्रार नोंद दाखला अन्वये घेतली आहे. पोलीस निरीक्षक (गुन्हे) नागपाडा पोलीस ठाणे, मुंबई यांनी दिनांक ९.९.२०२० रोजी श्री. विठ्ठल गणपत तोतरे यांचा वारंवार शोध घेण्यात आला परंतु त्यांचा शोध न लागल्याने सदर प्रकरणाची चौकशी बंद करण्यात आली आहे असे प्रमाणपत्र दिले आहे.

२. श्री. विठ्ठल गणपत तोतरे यांना अचानक बेपत्ता होऊन सात वर्ष पूर्ण झाले आहेत. श्री. विठ्ठल गणपत तोतरे हे बेपत्ता असल्याने त्यांनी नामनिर्देशित केल्याप्रमाणे श्रीमती सुनिता विठ्ठल तोतरे, पत्नी यांना कुटुंब निवृत्ती वेतन/ रजेचे रोखीकरण/भविष्य निर्वाह निधी इत्यादी लाभासाठी शिक्षण निरिक्षक, दक्षिण विभाग, बृहन्मुंबई यांनी सादर केलेला प्रस्ताव आयुक्त शिक्षण कार्यालयाने दिनांक ६.१.२०२२ च्या पत्रान्वये सादर केला आहे. त्यामध्ये बेपत्ता श्री. विठ्ठल गणपत तोतरे यांच्या पत्नी श्रीमती सुनिता विठ्ठल तोतरे यांना क्षतिपूर्ती बंधपत्र व प्रथम खबरी अहवाल, पोलीस स्टेशनचे अंतिम अहवाल इ. कागदपत्रांसह दाखल केला आहे. श्रीमती सुनिता विठ्ठल तोतरे यांना कुटुंब निवृत्तीवेतन व उपदान मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यावर पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

शासन निर्णय:-

१. श्री. विठ्ठल गणपत तोतरे, शिपाई शिक्षण निरीक्षक, दक्षिण विभाग, बृहन्मुंबई कार्यालय हे दिनांक १६.७.२०१३ पासून बेपत्ता होऊन ७ वर्षे झाल्याने त्यांनी नामनिर्देशित केल्याप्रमाणे श्रीमती सुनिता विठ्ठल तोतरे यांना कुटुंब निवृत्ती वेतन/ रजेचे रोखीकरण/भविष्य निर्वाह निधी

प्रदान करण्यास शासन मंजूरी देत आहे. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक सेनिवे-१०८९/ ४९१/ सेवा-४, दिनांक ५.७.१९९१ अन्वये क्षतिपूर्ती बंधपत्र परिपूर्ण करुन व आवश्यक बाबींची पूर्तता करुन घेण्याची शिक्षण निरीक्षक, दक्षिण विभाग, बृहन्मुंबई यांनी जबाबदारी घ्यावी.

२. (१) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दिनांक ५.७.१९९१, (२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक सेनिवे-१०८९/४९१/सेवा-४, दिनांक ७.१०.१९९३, (३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक सेनिवे-१०९४/१५६/सेवा-४, दिनांक २६.६.१९९५ व (४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक सेनिवे-१०००/प्र.क्र.८३/सेवा-४ दिनांक ३.७.२००० ला अनुसरुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४०४१४४८५४८३२१ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH BASAVESHWAR MAMADAPURE

Digitally signed by SANTOSH BASAVESHWAR MAMADAPURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3bfe111652996d95372924b1d22cdf88b33dfa2a3de3d8ea011b7d83adc40cb6, pseudonym=EB81C64443B702FB77DC1591B2143DFF0994DDB2, serialNumber=557ABE7A7194EC5DDC74DF537D7D57A9DBDA20B1937A2E41983C35F6A3886AD8, cn=SANTOSH BASAVESHWAR MAMADAPURE
Date: 2022.04.04 14:51:37 +05'30'

**( संतोष ममदापुरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई
३) महालेखापाल (लेखा परीक्षा)व (लेखा व अनुज्ञेयता)१/२, मुंबई/नागपूर
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५) शिक्षण निरीक्षक, दक्षिण विभाग, बृहन्मुंबई
६) श्रीमती सुनिता विठ्ठल तोतरे, हाजी कासम चाळ,२१/२८ तळमजला, डॉ. महेश्वरी रोड, डोंगरी पोलीस स्टेशनच्या बाजूला, मुंबई -४०० ००९
७) निवड नस्ती (प्रशा-५)